**मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली साखर उद्योगाच्या प्रश्नासंदर्भात दिनांक ०९/०४/२०१७ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सहकारी साखर कारखान्यांच्या कर्जाच्या पुनर्गठनाबाबत व शासकीय हमी देण्याबाबत अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका २०१७ /प्र.क्र.८१/ ३-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ जुलै, २०१७

वाचा :- **मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली साखर उद्योगाच्या प्रश्नासंदर्भात दिनांक ०९/०४/२०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त**

**प्रस्तावना -:**

महाराष्ट्रात मागील वर्षामध्ये कमी ऊस उपलब्धतेमुळे बऱ्याच प्रमाणात कारखाने बंद राहिले आहेत. अथवा कमी गाळप क्षमतेने कारखाने चालविल्यामुळे कारखान्यांच्या उत्पादन खर्चात वाढ होऊन कारखान्याची कर्ज परतफेडीची क्षमता राहिलेली नाही. कारखान्यांचे नक्त मूल्य उणे झालेले आहे. आगामी गाळप हंगाम २०१७-१८ मधील उसाची उपलब्धता विचारात घेता कारखाने सुरू होणे गरजेचे आहे व यासाठी हंगाम पूर्व कामाकरिता तसेच ऊस तोडणी व वाहतुकीच्या खर्चाकरिता कारखान्यांना खेळत्या भांडवली कर्जाची व अल्प मुदत कर्जांची आवश्यकता आहे. सदर सहकारी साखर कारखान्यांची कर्ज परतफेडीची क्षमता नसल्याने हे कारखाने एन.पी.ए मध्ये जाण्याची व अशा कारखान्यांना बँकांकडून कर्जपुरवठा न होण्याची शक्यता असल्याने कर्जाचे पुनर्गठन करणे आवश्यक असल्याचे निदर्शनास आले आहे.

महाराष्ट्रातील साखर उद्योगाच्या प्रश्नांसंदर्भात दि.९.४.२०१७ रोजी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या बैठकीत चर्चा झाली. यात साखर उद्योगांसमोरील आर्थिक आव्हानांमध्ये थकित कर्जाची परतफेड करण्यासाठी कर्जाची पुनर्रचना करणे,तसेच खेळत्या भांडवली व पूर्व हंगामी खर्चासाठी अल्पमुदत कर्जास शासनाची थकहमी देण्याबाबत याबाबत साखर कारखान्यांकडून वारंवार मागणी होत आहे.

आर्थिकदृष्ट्या अडचणीत असलेल्या कारखान्यांच्या कर्जाच्या पुनर्गठनाबाबत व शासकीय हमी देण्याबाबत अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमून धोरण तयार करण्यात येईल असा निर्णय या बैठकीत चर्चेअंती घेण्यात आला.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्रातील सध्या आर्थिकदृष्ट्या अडचणीत असलेल्या सहकारी साखर कारखान्यांच्या थकित कर्जाची पुनर्रचना तसेच या कारखान्यांच्या खेळत्या भांडवली व अल्प मुदत कर्जांना शासकीय हमी देण्याबाबत अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमून धोरण तयार करण्यात येईल असा निर्णय घेण्यात आला. त्याप्रमाणे या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

**सहकारी साखर कारखान्यांच्या कर्जाच्या पुनर्गठनाबाबत व शासकीय हमी देण्याबाबत अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे अध्यक्षतेखाली समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | अप्पर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय मुंबई | अध्यक्ष |
| २ | अप्पर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सदस्य |
| ३ | व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड, मुंबई | सदस्य |
| ४ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई | सदस्य |
| ५ | आयुक्त,साखर, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ६ | उपसचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे-

१) कर्ज पुनर्रचना करण्याबाबत पात्रता निकष निश्चित करणे.

२) दि. ३१.३.२०१७ रोजी देय असलेल्या मुदती कर्जाची रक्कम निश्चित करणे.

३) पुनर्रचित कर्जावरील व्याजाचा दर निश्चित करणे.

४) कर्ज पुनर्रचना अंतर्गत पात्र कारखान्यांनी पूर्तता करावयाच्या अटी व शर्ती निश्चित करणे.

या व्यतिरिक्त अन्य मुद्दे समितीच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट करावयाचे असल्यास त्याबाबत या समितीच्या प्रथम बैठकीत निर्णय घेतला जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०७२४१३२४१२२७०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2017.07.26 15:28:36 +05'30'

**(दि.शि. देसाई)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रत,**

१) मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

३) मा. मंत्री ( वित्त ) यांचे खाजगी सचिव

४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई

५) अप्पर मुख्य सचिव ( वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६) अप्पर मुख्य सचिव(सहकार),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव( नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड , मुंबई
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मुंबई.
१०) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग
११) विक्रीकर आयुक्त माझगाव, मुंबई
१२) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य पुणे,
१३) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर संघ म., नरिमन पॉईंट,मुंबई
१५) वेस्ट इंडियन शुगर मिल असोशिएशन, साखर संकुल, शिवाजीनगर पुणे (WISMA)
१६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८) उपसचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) उप सचिव (साखर) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) कार्यासन २५-स, कार्यासन
२१) निवडनस्ती कार्यासन ३- स